**महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (शिक्षण सक्षमीकरण शाखा) मधील अधिकाऱ्यांच्या विनंती बदल्या.**
**अधिव्याख्याता, जिल्हा शैक्षणिक सात्तत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली ३११७/ प्र. क्र.११८/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०७ जुलै, २०१७

**-शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हा दि. १ जुलै, २००६ पासून अंमलात आला आहे. सदर अधिनियमातील कलम ६ नुसार बदली करण्याबाबत सक्षम प्राधिकारी घोषित करण्यात आले आहेत. तसेच या कलमाच्या परंतुक २ नुसार बदली करणा-या सक्षम प्राधिका-याला, सर्वसाधारण व विशेष आदेशाद्वारे या कलमाखाली त्याचे अधिकार त्यांच्या कोणत्याही दुय्यम प्राधिका-याकडे सोपविता येतील अशी तरतूद करण्यात आलेली आहे.

२. महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ व ब मधील विविध संवर्गातील अधिका-याच्या लगत नंतरच्या प्राधिका-याच्या पूर्व मान्यतेने खालील तक्त्यात नमूद अधिव्याख्याता संवर्गातील अधिका-यांची त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव, पदनाम व सध्याचे कार्यरत ठिकाण | सध्याचे कार्यरत ठिकाण | बदलीनंतरची पदस्थापना | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्रीमती वर्षा वसंत बनसोडे उर्फ वर्षा राजेंद्र कांबळे, | अधिव्याख्याता, जिल्हा शैक्षणिक सात्तत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था, रत्नागिरी | अधिव्याख्याता, जिल्हा शैक्षणिक सात्तत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था, कोल्हापूर | विनंतीनुसार बदली |

३. आयुक्त ( शिक्षण ), पुणे यांनी या आदेशाप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होतील याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर आदेश बदली अधिनियम २००५ मध्ये नमूद कलम ४ (४) व (५) मधील तरतुदीनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०७१७३०३२३५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sport Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd5fc4fce5f6732e6657dca817ae6ee619a55d170d3c93eff53c3ca69d1a772d, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2017.07.07 17:30:54 +05'30'

(र. प्र. आटे)
सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. आयुक्त, शिक्षण आयुक्तालय (मध्यवर्ती इमारत),महाराष्ट्र राज्य,पुणे
२. सर्व संचालक
३. सर्व विभागीय अध्यक्ष, माध्य. व उच्च माध्य. शिक्षण मंडळ
४. सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
५. संबंधित जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
६. प्राचार्य, **जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण व्यावसायिक विकास संस्था, रत्नागिरी / कोल्हापूर**
७. शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक), **रत्नागिरी / कोल्हापूर**
८. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी/कोल्हापूर
९. संबंधित अधिकारी ( शिक्षण आयुक्तालयामार्फत )

**प्रत माहितीस्तव,**

१. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
३. निवडनस्ती, प्रशा-२.